| Points to be considered while deciding leads for construction materials for preparation of estimates for Administrative Approval & during execution. | पाटबंधारे प्रकल्पासाठी लागणाऱ्या सामग्रीच्या अनुषंगाने प्रशासकीय मान्यतेची प्राक्कलने/ कामाची अंमलबजावणी करताना वहन अंतराबाबत विचारात घ्यावयाच्या बाबी. |
|---|---|

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकःवहन-१०१०/(६००/२०१०)/मोप्र-१**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १२ नोव्हेंबर २०१०**

**संदर्भ** : **१)** शासन परिपत्रक जलसंपदा विभाग क्रमांक- संकीर्ण-१०९८/(९६/९८)/मोप्र (प्र), दिनांक ०४.०९.२०००
**२)** शासन परिपत्रक जलसंपदा विभाग क्रमांक- संकीर्ण-२००९/(४६५/१००९)/मोप्र-२, दिनांक १५.०१.२०१०

**परिपत्रकः—**

१.०० संदर्भिय शासन परिपत्रक क्र. १ व २ अन्वये जलसंपदा विभागाकडील प्रकल्पांची अंदाजपत्रके तयार करतांना बांधकामासाठी लागणा-या साधन सामुग्री / पाणी इत्यादीसाठी वहन अंतर ठरविण्याबाबत सूचना देण्यात आलेल्या आहेत. प्रशासकीय मान्यता प्रदान करुन प्रकल्पाच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मंजुरी देताना किंवा प्रत्यक्ष काम सुरु झाल्यानंतर काही वेळा मूळ मंजूर प्रशासकीय वहन अंतरापेक्षा जास्त अंतरावरुन बांधकाम साहित्य आणून बांधकाम करावे लागत असल्याचे निदर्शनास आले आहे. यानुसार काम केल्यामुळे प्रकल्पाच्या एकूण खर्चात वाढ होत आहे. प्रकल्प खर्चातील वाढ मर्यादित रहावी व अधिक सूसुत्रता यावी यासाठी पुढीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत :-

१) उपरोक्त संदर्भिय क्र. १ येथील परिपत्रकानुसार दिलेल्या सूचनांचे कार्यकारी अभियंता / अधीक्षक अभियंता व मुख्य अभियंता स्तरावर काटेकोरपणे पालन करुन प्रशासकीय मान्यता प्रस्ताव तयार करावेत व त्याप्रमाणे प्रत्यक्ष काम करण्यात यावे. वरील बाबींचे पालन होते, याची महामंडळस्तरावर प्रत्येक प्रकरणी खातरजमा करावी.

२) प्रशासकीय मान्यतेपुर्वी सखोल सर्वेक्षण व अन्वेषण केल्यानंतर साहित्याच्या वहन अंतरात सुधारणा अपेक्षित नाही. अपवादात्मक परिस्थितीत प्रकल्पाच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मंजूरी प्रदान करताना अथवा प्रत्यक्ष काम सुरु झाल्यानंतर मंजूर वहन अंतरापेक्षा जास्त अंतरावरुन बांधकाम साहित्य / पाणी आणण्याची आवश्यकता पडल्यास अशा प्रकरणी सदर कामाचे संबंधित उप अभियंता यांनी अन्य विभागातील कार्यरत उप अभियंता यांचेसोबत सदर बदल झालेल्या वहन अंतराची संयुक्त तपासणी करावी व प्रमाणित करावे. तसेच संबंधित कामाचे कार्यकारी अभियंता यांनीही बदल झालेल्या वहन अंतराची स्वतः तपासून खात्री करुन प्रमाणित करावे. वरीलप्रमाणे

झालेल्या वहन अंतराच्या बदलास सक्षम स्तरावर अधीक्षक अभियंता / मुख्य अभियंता यांच्या मान्यतेनंतर काम हाती घ्यावे. दगड, खडी वगैरे साहित्यासाठी सुधारीत वहन अंतर विचारात घेण्यापूर्वी कामाच्या ठिकाणापासून नजीक नवीन खाण विकसीत करणे तसेच पाण्यासाठी जवळचा स्त्रोत विकसीत करणे किफायतशीर आहे किंवा कसे याची खातरजमा करावी. त्याशिवाय वाढीव वहन अंतरासाठी मान्यता देऊ नये.

अन्य विभागातील उप अभियंता यांचे संयुक्त तपासणी / पाहणीसाठीचे आदेश संबंधित अधीक्षक अभियंता यांनी निर्गमित करावयाचे आहेत.

२.०० उपरोक्त सक्षम स्तरावर मान्यता दिलेल्या बदलांमुळे होणाऱ्या अधिक खर्च / अंदाजपत्रकास व त्याअन्वये येणा-या दायित्वास महामंडळाच्या कार्यकारी संचालकांची पूर्वमान्यता आवश्यक राहील. वरीलप्रमाणे मुद्दा क्र.१ व २ येथे दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे. सदर सूचनांचे / कार्यपध्दतीचे पालन न केल्यास व सदर कामाच्या वहन अंतरात विसंगती आढळल्यास सर्व संबंधित अधिकारी जबाबदार राहतील व ते शिस्तभंगाच्या कार्यवाहीस पात्र राहतील, याची नोंद घ्यावी.

सदर परिपत्रक शासनाच्या बेवसाईटवर २०१०१११२१७२५२६००१ ठेवण्यात आले आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( दी. धों. भिडे )**
**मुख्य अभियंता (द.व प्र.) व सह सचिव**

प्रति,

स्वीय सहायक, मा.मंत्री, जलसंपदा (कृखोपामं वगळून) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.मंत्री, जलसंपदा (कृखोपामं) मंत्रालय, मुंबई
महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीखा), महाराष्ट्र, मुंबई /नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मुख्य अभियंता व पदसिध्द सह सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व अधिक्षक अभियंता व पदसिध्द उप सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व कार्यकारी अभियंता व पदसिध्द अवर सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे
सर्व क्षेत्रिय मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व क्षेत्रिय अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व क्षेत्रिय कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व तांत्रिक कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व उप अभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी, मोप्र-२, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई / मो.प्र.१, निवड धारिका.